# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक दुरूस्ती-१०१८/प्र.क्र.४११/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ०३ जानेवारी २०१९.

**विषय** :- मुख्यालय, सशस्त्र पोलीस, वरळी, यांच्या अधिपत्याखालील पोलीस वसाहतीचा पाणीपुरवठा नळमार्ग दुरूस्त करून नूतनीकरण करणे या कामासाठी टक्केवारी खर्च *(Centage charges)* प्रदान करण्यास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. सीएनसी-१००३/ प्र.क्र.९७/ अर्थ.-१, दिनांक २०.१०.२००३.
२) शासन निर्णय, गृह विभाग, सीआरपी-०८१५/ प्र.क्र.३५१/ पोल-७, दिनांक ०७.०९.२०१५.
३) शासन निर्णय, गृह विभाग, सीआरपी-०५१६/ प्र.क्र.३३७/ पोल-७, दिनांक ०३.१०.२०१६.
४) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/ कक्ष-८(१२)/शा.१६६/२०१८, दिनांक ०२.०७.२०१८.

**ज्ञापन.-**

मुख्यालय, सशस्त्र पोलीस, वरळी, यांच्या अधिपत्याखालील पोलीस वसाहतीचा पाणीपुरवठा नळमार्ग दुरूस्त करून नूतनीकरण करणे अशा ३३ कामांसाठी शासन निर्णय, गृह विभाग, सीआरपी-०८१५/ प्र.क्र.३५१/ पोल-७, दिनांक ०७.०९.२०१५, द्वारे रु.९८,८३,६८०/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

२. शासन निर्णय, गृह विभाग, सीआरपी-०५१६/ प्र.क्र.३३७/ पोल-७, दिनांक ०३.१०.२०१६, द्वारे उक्त कामासाठी सन २०१६-१७ वित्तीय वर्षात रु.९८.८३ लक्ष (१०० टक्के) इतका निधी वितरीत करण्यात आला होता.

३. तथापि, उक्त खर्चाच्या अंदाजामध्ये टक्केवारी खर्च *(Centage charges)* समाविष्ट नव्हता. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. सीएनसी-१००३/ प्र.क्र.९७/ अर्थ.-१, दिनांक २०.१०.२००३, अनुसार सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात येणाऱ्या बांधकामांसाठी टक्केवारी खर्च आकारण्यात येतो. त्या अनुसार पाच टक्के दराने टक्केवारी खर्च आकारून सार्वजनिक बांधकाम विभागाकडून देयके प्रदान करण्यात आली आहेत. त्याकरिता रु.४,२७,९६६/- इतक्या जादा खर्चासह प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाने सादर केला आहे.

४. उक्त कामासाठी टक्केवारी खर्च म्हणून रु.४,२७,९६६/- इतकी जादा रक्कम प्रदान करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सहमती दिली आहे.

**५.** त्या अनुसार, मुख्यालय, सशस्त्र पोलीस, वरळी, यांच्या अधिपत्याखालील पोलीस वसाहतीचा पाणीपुरवठा नळमार्ग दुरूस्त करून नूतनीकरण करणे या कामासाठी टक्केवारी खर्च *(Centage charges)* म्हणून **रु.४,२७,९६६/-** *(रुपये चार लक्ष, सत्तावीस हजार, नऊशे सहासष्ट फक्त)* इतकी रक्कम प्रदान करण्यासाठी, याद्वारे, मान्यता देण्यात येत आहे.

**६.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, ००, १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत)(अनिवार्य) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**७.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५१३/१८/इमा.-२, दिनांक १७.१२.२०१८, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१०८११३७०६०६२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.01.08 11:46:25 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत-**

१) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई.
२) कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल (पोल-७).